झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबई/पुणे व पिंपरी चिंचवड आणि नागपूर तसेच मुंबई महानगर प्रदेश वगळता राज्यातील इतर क्षेत्राकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्यासंदर्भात शासनास शिफारस करण्यासाठी अभ्यास गटाची स्थापना.

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्रमांक : झोपुयो- २०२०/प्र.क्र.६६/२०२०/झोपसु
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ सप्टेंबर,२०२०

वाचा :- शासन निर्णय.झोपुयो -२०१३/प्र.क्र.१७/झोपसु,दि.३०/०५/१४

## प्रस्तावना

१. महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मुलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ च्या प्रकरण एक-अ च्या कलम ३-अ पोटकमल (१) खाली शासनाने बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रासाठी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्याचा निर्णय सन १९९५ मध्ये घेतला. तद्नंतर शासनाने नागपूर महानगरपालिका क्षेत्राकरीता दिनांक २४/०८/२००४ च्या अधिसूचनेद्वारे झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण नागपूर यांची स्थापना करण्यात आली आहे. सन २००५ मध्ये झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण पुणे स्थापन करण्याचा निर्णय घेतला. तर, दिनांक ११/०९/२०१४ च्या अधिसूचनेद्वारे ठाणे महानगरपालिका क्षेत्राचा समावेश झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई मध्ये करण्यात आला आहे.

२. तसेच, MMR SRA स्थापन करण्याबाबत अभ्यास करून शासनास शिफारस सादर करण्याबाबत दिनांक ३०/०५/१४ च्या शासन निर्णयाद्वारे स्थापन करण्यात आलेल्या अभ्यास गटाची शिफारस मान्य करून दिनांक २६/०८/२०२० रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत निर्णाय घेण्यात आला असून दिनांक ०८/०९/२०२० च्या अधिसूचनेद्वारे मुंबई महानगर प्रदेश (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळता इतर एकूण ८ महानगरपालिका तसेच ७ नगरपालिका क्षेत्रामध्ये) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्यात आले आहे. तसेच राज्यातील इतर प्रमुख शहरांमध्ये झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्यासाठी अभ्यास गट नेमण्याबाबत निर्णय दिनांक २६/०८/२०२० च्या मंत्री मंडळ बैठकीमध्ये घेण्यात आला आहे.

३. या पार्श्वभूमीवर झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबई,पुणे व पिंपरी चिंचवड, नागपूर आणि मुंबई महानगर प्रदेश वगळता राज्यातील इतर क्षेत्रांकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करणे उचित होईल अथवा झोपडपट्टीत राहणऱ्या लोकांचे पुनर्वसन करण्यासाठी अन्य कोणती उपाययोजना करणे योग्य ठरेल, त्या अनुषंगाने खालील नमुद केलेल्य मुद्यांबाबत योग्य त्या शिफारशी करण्यासाठी एक अभ्यासगट गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मुंबई,पुणे व पिंपरी चिंचवड, नागपूर आणि मुंबई महानगर प्रदेश वगळता राज्यातील प्रमुख शहरातील झोपडपट्टयांच्या पुनर्वसनाबाबत अभ्यास करून शासनास अहवाल सादर करण्यासाठी खाली नमूद केलेल्या अभ्यास गटाची स्थापना करण्यात येत आहे.

**अभ्यासगटाची रचना :-**

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, गृहनिर्माण | समन्वयक |
| २ | प्रधान सचिव, नगरविकास (१) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, नगरविकास (२) | सदस्य |
| ४ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ५ | संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य पुणे | सदस्य |
| ६ | मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे व पिंपरी चिंचवड झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे | सदस्य |
| ७ | उपसचिव (गृहनिर्माण) | सदस्य सचिव |

**अभ्यासगटाची कार्यकक्षा**:-

१) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबई,पुणे व पिंपरी चिंचवड आणि नागपूर तसेच मुंबई महानगर प्रदेश (बृहन्मुंबई वगळता) राज्यातील प्रमुख शहरांकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्याच्या अनुषंगाने उपरोक्त क्षेत्रांतील झोपडपट्टयांच्या विविध प्रश्नांचा अभ्यास करून पुनर्वसन होण्याकरीता पर्यायांचा विचार करून शिफारस करणे

२) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबई,पुणे व पिंपरी चिंचवड आणि नागपूर तसेच मुंबई महानगर प्रदेश (बृहन्मुंबई वगळता) राज्यातील प्रमुख शहरांकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्याच्या अनुषंगाने उपरोक्त क्षेत्रासाठी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणे स्थापन करणे योग्य ठरेल अथवा नाही, याबाबत शिफारस करणे.

३) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबई,पुणे व पिंपरी चिंचवड आणि नागपूर तसेच मुंबई महानगर प्रदेश (बृहन्मुंबई वगळता) राज्यातील प्रमुख शहरांकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्याचे झाल्यास संबंधित प्राधिकरणास काही विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून त्यांना स्वतंत्र अधिकार देण्यात यावेत किंवा कसे ? याबाबत अभ्यास करून शिफारशी करणे.

४) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबई,पुणे व पिंपरी चिंचवड आणि नागपूर तसेच मुंबई महानगर प्रदेश (बृहन्मुंबई वगळता) राज्यातील प्रमुख शहरांकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण स्थापन करण्याच्या अनुषंगाने उपरोक्त क्षेत्रातील झोपडपट्टयांबाबत शासनास शिफारस करण्यासाठी स्थापन करण्यात येणाऱ्या सदरहू अभ्यासगटाने आपला अहवाल शासन निर्णयाच्या दिनांकापासून सहा महिन्यात शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१८१६३५५४५६०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DURGAPRASAD
POCHAYYA
MYLAWARAM

Digitally signed by DURGAPRASAD POCHAYYA MYLAWARAM
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=f4fd0ac26ad2a365a8e829907c5e76b911fed9b1b9e48cc2854c4b8a14b0d70c, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=befbb0ae84804c4da8d35abf2195ebb1dc727de9b0a094bea77f4ca6be5965db, ou=HOUSING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DURGAPRASAD POCHAYYA MYLAWARAM
Date: 2020.09.18 16:38:15 +05'30'

**( दुर्गाप्रसाद मैलावरम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. सर्व सन्मानीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
८. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
९. मा. मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई,
१०. प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई,
११. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१), मंत्रालय,मुंबई,
१२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२), मंत्रालय,मुंबई,
१३. प्रधान सचिव (उद्योग),उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई,
१४. आयुक्त, महानगरपालिका ( ठाणे, नवी मुंबई, पनवेल, कल्याण-डोंबिवली, भिवंडी-निजामपुर, वसई-विरार, मिरा-भाईंदर, उल्हासनगर)
१५. व्यवस्थापकीय संचालक, शहरे व औद्योगिक विकास महामंडळ (सिडको),बेलापूर, नवी मुंबई.
१६. संचालक,नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे व पिंपरी चिंचवड झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे.
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,अंधेरी,मुंबई.
१९. सह सचिव/उपसचिव/सर्व अवर सचिव/ सर्व कक्ष अधिकारी,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई
२०. मुख्याधिकारी नगरपालिका ( अंबरनाथ,बदलापूर,पेण,अलिबाग,खेपोली, माथेरान,कर्जत,)
२१. निवडनस्ती, कार्यासन-झोपसु.